# परोपकारी नामपुत्र

(एक अद्भुतरम्य मनोरंजक बालकथा)


-: लेखक :-

दिवाकर नेमाडे



रम्यकथा प्रकाशन,

३९२ नारायण पेठ, काम्हेरे बिल्डिंग, पुणें ३०.


किंमत ३० पैसे

# परोपकारी नागपुत्र

वत्सगुल्म नगरींत वाकाटक राजे राज्य करीत होते तेव्हांची ही गोष्ट आहे.

त्या नगरींत एक गरीब लांकूडतोड्या रहात होता. त्याचं नांव धडकू आणि त्याच्या बायकोचं नांव होतं झमकी.

धडकू रोज रानांत जाऊन लांकडं तोडून, मोळी बांधून आणायचा. ती संध्याकाळीं विकायचा. घरीं येतांना आलेल्या पैशाची ज्वारी आणायचा.

त्यानं आणलेली ज्वारी झमकी तेव्हांच दळायची आणि मग भाकऱ्या करायची. दोघं जेवायचीं आणि झोंपायचीं. असे त्यांचे दिवस चालले होते.

एक दिवस धडकू लांकडं आणण्यासाठीं पद्मतळ्याच्या बाजूला गेला. दुपारीं दोन वाजेपर्यंत त्यानं एक मोळी होईल इतकीं लांकडं तोडलीं. मोळी बांधली आणि फडक्यांत बांधून आणलेली रात्रीची शिळी भाकर खायला तो बसला.

भाकर खाऊन, पाणी पिऊन त्यानं ढेकर दिला. दिवस कलला आहे, आपण लवकर जायला पाहिजे हें त्याला कळत होतं. पण जेवण झाल्यावर त्याचं अंग जड झाल्यासारखं वाटलं म्हणून तो लवडला. जरा वेळ लवंडल्यावर आपण मोळी घेऊन गांवांत जाऊं असं त्यानं ठरवलं.

पण सकाळपासून फार कष्ट केल्यामुळं तो थकला होता. गवतावर लवंडल्यावरच तो झोंपीं गेला.



थोड्या वेळानं पद्मतळ्याच्या कांठावरच्या जुन्या वडाच्या बुंध्यांतून एक नाग निघाला. सळसळ करत तो धडकूपाशीं आला. धडकू आपला गाढ झोंपला होता. तो नाग फणा काढून जरा वेळ धडकूकडे पहात उभा राहिला आणि त्यानं परत सरपटायला सुरुवात केली. धडकूनं बांधून ठेवलेल्या मोळीपाशीं नाग आला, जरा वेळ थांबला आणि सरसर चालत बांधलेल्या मोळींत शिरला. मोळीच्या आंत लहानशी पोकळी होती तींत तो दडून बसला.

धडकूची झोंप संपली. तो धडपडून उठला आणि पश्चिमेकडे पहायला लागला. सूर्य खूप खालीं गेला होता. आपल्याला उशीर झाला म्हणून त्याला वाईट वाटलं.

त्यानं धडपडत उठून मोळी डोक्यावर घेतली आणि तो पळतच नगराकडे निघाला. जास्त उशीर झाला तर आपली मोळी कोणी घेणार नाहीं. मोळी विकली गेली नाहीं तर आपल्याला व आपल्या लाडक्या झमकीला उपाशी रहावं लागेल अशी त्याला भीति वाटत होती. म्हणून तो सारखा पळत नगरांत आला.

त्याच्या नेहमींच्या जागीं लांकूडबाजारांत मोळी ठेवून त्यानं

गिऱ्हाइकांची खूप वाट पाहिली. पण उशीर झाल्यामुळं त्यादिवशीं त्याची मोळी विकली गेली नाहीं.

निराश मनानं मोळी उचलून तो घरीं आला. त्याचं घर म्हणजे नगराबाहेर एक मोडकं तोडकं झोंपडं होतं. त्या झोंपडी-समोरच्या अंगणांत त्यानं वैतागानंच डोक्यावरची मोळी आपटली.



त्याबरोबर मोळींतून लाल, निळे प्रकाशकिरण फेंकणारा रत्न-हार उडून टप्‌दिशीं जमिनीवर आदळला. धडकूनं एक उडी मारूनच तो रत्नहार उचलला. आपल्या मोळींत रत्नहार कुठून आला हें त्याला कळत नव्हतं. साधी नकली मोत्यांची माळ त्यानं कधीं पाहिली नव्हती. आतां तो हातांतल्या रत्नहाराकडे वेड्या-सारखा पहातच उभा राहिला.

मोळीच्या आपटण्याचा आवाज ऐकून झमकी पळतच अंगणांत आली. 'हें काय, मोळी विकली नाहीं?' आणि हें बोलतांनाच तिचं धडकूच्या हातांतल्या रत्नहारावर लक्ष गेलं. तिला खूप आश्चर्य वाटलं. 'अहो, हा कसला हार आहे? किती चमचम करतोय्!'

धडकूनं रत्नहार धोतरांत लपवला व तिला न बोलण्याची खूण केली. दोघंजण झोंपडींत आलीं.

बारीक आवाजांत धडकू म्हणाला, 'वेडे, हा रत्नहार असला पाहिजे. रत्नं अशींच चमकतात असं मीं ऐकलं आहे...'

'तुम्ही तो हार कोठून आणलांत ?...चोरी केलीत ?'

'नाहीं. मीं अंगणांत मोळी टाकली तेव्हां मोळींतून हा हार निघाला...पण आतां या हाराचं काय करायचं ?'

'काय करायचं म्हणजे ? तुम्हीं चोरी नाहीं ना केली ?.... झालं तर मग. मी घालीन तो हार.'

'शहाणी आहेस. आपल्यासारख्या गरीबाजवळ रत्नहार पाहिला तर लोक आपल्याला चोरच म्हणतील. राजाला सांगतील. राजा आपल्याला कैदेंत टाकील...'

'मग विकून टाका. म्हणजे मी दोन पातळं तरी घेईन.'

'नाहीं ! नाहीं ! हा हार विकायचा नाहीं. दुकानदाराला विकण्यासाठीं हार दाखवतांच तोहि आपल्यावर चोरीचा आरोप करील.'

'मग याचं तुम्ही करणार तरी काय ?'

'उद्यां सकाळीं सांपडला म्हणून राजाला अर्पण करतों. राजा खूष झाला तर थोडी बक्षिसी तरी मिळेल.'

मग तीं नवरा–बायको उपाशींच झोंपलीं.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं न्हावून धुऊन धडकू राजाच्या दरबारांत गेला. राजे वाकाटक सिंहासनावर बसले होते आणि त्यांचे अमात्य विष्णु नारायण काळे अदबीनं जवळच उभे होते.

धडकूनं पुढं होऊन राजाला नमस्कार केला.

'कोण आहेस तूं ?' राजानं विचारलं.

'मी धडकू लांकूडतोड्या आहें.'

'काय तक्रार आहे तुझी ?'



'महाराज, मी काल पद्मतळ्याच्या बाजूला लांकडं तोडण्यासाठीं गेलों होतों.' आणि त्यानं सर्व हकीकत सांगून रत्नहार राजाच्या पायांजवळ ठेवला.

विष्णु नारायणनं तो हार उचलला. राजाच्या दरबारांत मोठमोठे जवाहिरे होते. त्यांना बोलावून त्या रत्नांची परीक्षा करण्यांत आली.

'महाराज ! यांतलं प्रत्येक रत्न पृथ्वीमोलाचं आहे अशीं रत्नं सहसा मिळत नाहींत.'

राजानं एक वेळ रत्नहाराकडे पाहिलं, एक वेळ धडकूकडे पाहिलं, 'मग काय म्हणणं आहे तुझं ?'

'महाराज, माझ्यासारख्या गरीबाला काय करायचा हा रत्नहार ? तो तुम्हांला अर्पण करण्यासाठींच मीं आणला आहे. त्याचा स्वीकार करा महाराज.' धडकूनं हात जोडले.

राजानं मान हलवली, 'अमात्य, या धडकूला बक्षीस म्हणून

दहा हजार सोन्याच्या मोहोरा द्या.'

'जशी आज्ञा महाराज.' अमात्य म्हणाला.

मग राजाच्या दरबारचीं इतर कामं चालू झालीं.

पण राजाच्या सिंहासनामागं स्वतःच्या खास जागेंत बसलेल्या राणी कमलादेवीला धीर निघत नव्हता. धडकून आणून दिलेला हार आपण कधीं गळ्यांत घालतों असं तिला होऊन गेलं होतं. दरबारचं काम संपेपर्यंत तिनं कसाबसा धीर काढला. काम संपल्यावरहि अमात्य महाराजांशीं कांहीं बोलतो आहे, हें पाहून तिला अमात्याचा राग आला. तिनं एका दासीला महाराजांना बोलवायला पाठवलं.

महाराज लगबगीनं आंत आले.

'हें काय महाराज! आम्ही तुमची केव्हांची वाट पहातों आहों आणि तुम्ही खुशाल त्या रिकामटेकड्या अमात्याशीं बोलत बसलांत.'

'तो रिकामटेकडा नाहीं.'

'तें जाऊं द्या. आधीं तो हार द्या. केव्हां एकदां तो गळ्यांत घालीन असं झालं आहे मला.'

राजानं हंसतच तो रत्नहार राणीला दिला. राणीनं तो हार एक वेळ आधाशी नजरेनं पाहिला आणि पटकन् गळ्यांत घातला. आपण कशा दिसतों हें दर्पणांत पहाण्यासाठीं पळतच स्वतःच्या महालांत गेली.

तेव्हांपासून तो हार राणीच्या गळ्यांत रहायला लागला. रात्रीं झोंपतांनासुद्धां राणी तो हार गळ्यांतून काढत नसे.

गरम पाण्यानं रत्नांचं तेज फिकं पडतं अशी थाप एका दासीनं मारली म्हणून राणी फक्त अंघोळ करतांना हार काढून न्हाणी-घरांत कोनाड्यांत ठेवत असे. अंघोळ झाली म्हणजे कपडे घाला-यच्या अगोदर हार गळ्यांत घालत असे.

राजा आणि राणी अगदीं सुखांत होतीं. देवाचं दिलेलं सर्वच होतं. कमतरता कशाची म्हणून नव्हती. पण एक असं दुःख होतं,

कीं या सर्व सुखांतहि कधीं कधीं राजाराणीचं चित्त लागत नसे. राजाला मूलबाळ नव्हतं. राज्याला वारस नव्हता मुलगी असती तरीहि चाललं असतं, पण तीहि नव्हती.

त्यामुळं राजाराणी दु:खी असत. औषधपाणी घेतलं, ऋषि-मुनींचे आशीर्वाद घेतले, मंत्रतंत्र केले. पण राजाला मूल झालं नाहीं. 'दुसरी राणी करा म्हणजे तुम्हांला मूल होईल!' असं राजाला अमात्य सांगत असे. दुसरेहि सांगत असत. स्वतः राणी कमलादेवी सांगत असे. पण राजानं कुणाचंच ऐकलं नाहीं.

एक दिवस राणी न्हाणीघरांत अंघोळीला बसली.

राजा त्याच्या महालांत बसला होता.

एक सेवक पळत पळत आला. तो नमस्कार करून म्हणाला, 'महाराज, ऋषि क्रोधाचार्य आले आहेत....'

राजाची एकच धांदल उडाली. तो बसलेला होता तो ताडकन् उभा राहिला, 'अरे, मग सांगायला काय आलास? जा. त्यांना



आंत घेऊन ये. नाहींतर थांब, मी स्वतःच त्यांच्या स्वागताला जातों ' राजा तसाच पळत निघाला.

क्रोधाचार्य अत्यंत रागीट होते. त्यांच्या मर्जीविरुद्ध कुणी वागलं कीं, त्यांना फार संताप येत असे. आणि मग संतापाच्या भरांत ते भयंकर शाप देत असत. त्यामुळं त्यांना सर्वच भीत असत.

राजा त्यांना घेऊन आंत आला. अत्यंत विनम्रपणानं त्यांना आसनावर बसवलं आणि त्यांची पूजा करण्यासाठीं पूजेचं तबक आणायला सेवकाला पाठवलं.

' राजा !' सुईसारख्या धारदार आवाजांत क्रोधाचार्य म्हणाले, ' मी तुझ्यावर फार प्रसन्न आहें. तुझं कुशल आहे ना ?'

' आपल्या आशीर्वादानं सर्व ठीक आहे महाराज प्रजा आनंदांत आहे कुठं कशाची कमतरता नाहीं. '

' तूं स्वतः सुखांत आहेस ना ?'

राजानं मान डोलावली

' तूं बोलत नाहींस म्हणजे तुला कसलं तरी दुःख आहे

' खरं आहे महाराज. '

' मला सांग तुझं दुःख '

' सर्व जगाला माहीत आहे महाराज, मला संतान नाहीं...'

ऋषींनीं डोळे बंद करून समाधि लावली. जरा वेळानं त्यांनीं डोळे उघडले तेव्हां त्यांचे डोळे रागानं लाल झाले होते. ' राजा, राणी कुठं आहे !'

' तिच्या महालांत असेल महाराज. तिच्याकडून कांहीं चूक...'

' चूक कांहींच नाहीं. पण मला एक वेळ राणीला पहायचं आहे. '

' आतां बोलावतों महाराज. '

' ताबडतोब जशी असेल तशी बोलाव मी येथें जास्त वेळ थांबणार नाहीं. ' आणि ते आसनावरून उठून उभे राहिले.

' महाराज, पूजा...'

' तूं आधीं राणीला बोलाव. '

राजाचा गोंधळ उडाला. ' ऋषिमहाराज रागावले आहेत ताब-

डतोब ये.' असा निरोप त्यानं पाठवला.

राणी अंघोळ करीत होती

दासी आली आणि ऋषि क्रोधाचार्य रागावल्याचं सांगून राजानं लवकर बोलावल्याचं सांगितलं.

ऋषिमहाराजांचा राग राणीलाहि माहीत होता. तिनं अंघोळ संपवली. लवकर लवकर कपडे घातले आणि ती धांवत पळत राजाच्या महालांत आली.

या गर्दीत तिचा रत्नहार न्हाणीघरांतल्या कोनाड्यांतच राहिला. तो गळ्यांत घालण्याची तिला आठवण राहिली नाहीं.

राणीनं येतांच ऋषिमहाराजांना वांकून नमस्कार केला.

ऋषिमहाराज राणीच्या कपाळाकडे संतापलेल्या डोळ्यांनीं पहायला लागले. तिचं नशीब वाचायला लागले.

'राजा!' ते कडाडले, 'तुम्हां दोघांच्याहि नशिबांत संतति नाहीं.'

राजानं हात जोडले, 'जशी ईश्वराची इच्छा...आपण आसनावर बसावं आणि पूजेचा स्वीकार करावा.'

कडकडणाऱ्या विजेसारखे ऋषिमहाराज कडाडले, 'निपुत्रिकांची पूजा मी स्वीकारीत नसतों.' आणि ते राजमहालांतून निघून गेले.

राजाराणीला फार वाईट वाटलं. आपल्याला कधींतरी मूलबाळ होईल असं त्यांना वाटत होतं पण आतां प्रत्यक्ष एवढ्या मोठ्या तपस्वी ऋषीनं सांगितल्यावर त्यांना फार दु:ख झालं.

राणी रडतच स्वत:च्या महालांत आली बराच वेळपर्यंत ती अंथरुणावर पडून रडत होती. पण असं किती वेळ रडणार? माणसाचं दु:ख कालांतरान हळूहळू कमी होतं. देवाचा त्याला तसा आशीर्वादच आहे.

दु:ख कमी झाल्यावर राणी तिच्या शृंगारगृहांत गेली. तिनं आरशांत पाहिलं आणि आपल्या गळ्यांत रत्नहार नाहीं हें तिच्या लक्षांत आलं.

ती एकदम घाबरली. आपला हार न्हाणीघरांत राहिला हें तिला माहीत होत. पण राजवाड्यांत शेंकडों नोकर आहेत, अनेक येणारे–जाणारे आहेत, कुणीं हार पळवला असला तर ? या भयानं तिला भडभडून आलं. तिनं दासीला बोलावलं.

त्या दासीचं नांव होतं काशी. 'आज्ञा राणीसाहेब !' म्हणून ती हात जोडून उभी राहिली.

'काशी, माझा रत्नहार न्हाणीघरांत राहिला आहे. जा, पळ लवकर, घेऊन ये.'

काशी पळतच न्हाणीघरांत आली. राणी नेहमीं ज्या कोनाड्यांत रत्नहार ठेवत होती तिथं तिनं पाहिलं आणि ती एकदम दचकली. आपण काय पहातों आहों हें तिला जरा वेळ कळलंच नाहीं.

कोनाड्यांत हार नव्हता. एक छोटंसं, गोरंगोरंपान, धिटुकलं बाळ हाताच्या मुठी चुटुचुटु चोखत खेळत होतं...



काय करावं तें काशीला सुचलं नाहीं तिनं तें बाळ उचललं आणि ती धांवत पळत राणीच्या महालांत आली

राणी तिची वाटच पहात होती. तिला मूल घेऊन पळत येतांना पाहून राणी ओरडली, 'अग, बाळ कुणाचं आणलंस ?... आणि माझा रत्नहार कुठं आहे ?'

काशी धांपा टाकीत म्हणाली, 'राणीसाहेब, न्हाणीघरांतल्या कोनाडयांत तुमचा हार नव्हता !'

'कोतवालाला बोलाव. कोणी हार चोरला त्याचा तपास लागायलाच पाहिजे.'

'त्याच कोनाडयांत जेथें तुम्ही हार ठेवतां तेथेंच हें बाळ होतं.'

राणीनं अधाशीपणानं तिच्या हातांतलं बाळ घेतलं. अधिऱ्या नजरेनं निरखलं, 'किती सुंदर आहे. थू: माझीच नजर होईल.... पण हें बाळ आहे कुणाचं ?'

आणि मग धांवपळ व्हायला सुरुवात झाली. कोतवाल राणीच्या रत्नहाराची चौकशी करायला धांवपळ करायला लागला. बाळ कुणाचं आहे ही चौकशी करत दासदासी पळायला लागल्या.

रात्र होऊन गेली पण रत्नहारहि सांपडला नाहीं आणि बाळाचे आईवडीलहि सांपडले नाहींत.

राजाला कळलं तेव्हां राजाहि राणीच्या महालांत आला एवढं सुंदर बाळ पाहून तोहि हरखला. बाळ सुंदर होतं तसं सुलक्षणी होतं. त्याला सोडावंसं राणीला वाटत नव्हतं

'कुणाचं असेल हो हें बाळ ?' राणी म्हणाली.

'आपण त्याच्या आईवडिलांचा तपास लावूंच.'

'लावा !.. पण मी हें बाळ परत देणार नाहीं'

'परत देणार नाहीं ? हा काय वेडेपणा.'

'असूं द्या वेडेपणा. मी या बाळाला वाढवणार आहें. मोठा करणार आहें हो क्की नाहीं रे राजा !'

रात्रभर तें मूल राणीजवळच राहिलं.

सकाळीं राणीनं राजज्योतिषाला बोलावलं. त्याला मुलाचं

भवितव्य वर्णन करायला सांगितलं.

ज्योतिषानं वेळेची कुंडली मांडली. बाळाचा हात पाहिला. शरीराच्या खाणाखुणा पाहिल्या. कांहीं गणित केलं आणि तो म्हणाला,

'राजेसाहेब, हा मुलगा फार सुलक्षणी आहे. अत्यंत गुणवान, विद्यावंत, प्रतापी वीर होईल. हा सम्राट होईल. अश्वमेध यज्ञ करील. घराण्याची कीर्ति दिगंत नेईल...पण...'

'पण काय ज्योतिषीमहाराज ?' राजानं विचारलं.

'हा मुलगा तुमचा नाहीं हें मला माहीत आहे आणि तुमचा असतां तरी सत्य सांगणं हाच माझा धर्म आहे. त्याप्रमाणच मी वागलों असतों.'

'आम्ही रागावणार नाहीं. जें काय असेल तें स्पष्ट आणि सत्य सांगा.' राजा म्हणाला.

ज्योतिषानं सुरुवात केली, 'हा मुलगा तरुण झाल्यावर याला याच्या पूर्वजन्माची आठवण येईल. याचा हा जन्म म्हणजे चमत्कार आहे. त्याचा उलगडा त्याला आपोआप होईल. पण तो तें कुणालाच सांगणार नाहीं. याच ठिकाणीं धोका आहे. कुणी याच्या मागं लागून याला याच्या पूर्वजन्माबद्दल किंवा हा खरोखर कोण आहे याबद्दल विचारील आणि हा सांगील तर याचं पूर्वजन्माचं शरीर याला प्राप्त होऊन हा निघून जाईल...'

'कोण होता हा पूर्वजन्मीं ?' राजानं विचारलं.

'पहा, तुम्हीं स्वतःच तें विचारलं. तसं मलाहि माहीत नाहीं हा पूर्वजन्मीं कोण होता तें.'

आपण चूक केली या जाणीवेनं राजा ओशाळला.

राणीनं मग मोठा उत्सव केला. बाळाला पाळण्यांत घातलं आणि त्याचं नांव ठेवलं राजकुमार सिंघण.

ज्योतिषानं सांगितलेलं गुपित राजा, राणी आणि दासी काशी या तिघांशिवाय कुणालाच माहीत नव्हतं. राणीनंहि त्याविषयीं वाच्यता न करण्याबद्दल काशीला ताकीद देऊन ठेवली होती.

आणि मग राजा–राणीचे दिवस सिंघणभोंवतीं आनंदांत जायला लागले. राजकुमार सिंघण हळूहळू मोठा व्हायला लागला.

राजाराणीनं पालन केलेला मुलगा हा लोकांचा समज विरायला लागला आणि लोक सिंघणला राजकुमारच समजायला लागले.

वाढत्या वयाबरोबर राजकुमार सिंघण विद्या, युद्धशास्त्र आदि राजधर्माला आवश्यक त्या सर्व विद्यांत पारंगत झाला. त्याचा हात धरणारा त्याच्या वयाचा कुणीच तरुण सर्व राज्यांत नव्हता.

प्रजेच्या उपयोगी पडण्याची आवड, गोरगरीबांविषयीं कनवाळूपणा यांमुळें प्रजेला तो आपल्यापैकींच एक वाटत असे. सर्वच त्याला जीव कीं प्राण असा जपत असत. राजाराणीला तर त्याच्याशिवाय जराहि करमत नसे.

राजाची दूरच्या नात्याची एक बहीण होती. तिचं नांव होतं विमलादेवी. पण सर्व लोक तिला ताईमहाराजच म्हणत असत. तीच एकटी अशी होती कीं, जी राजकुमार सिंघणचा द्वेष करीत असे. लोकांनीं त्याची स्तुति केली म्हणजे तिच्या तळपायाची आग मस्तकांत जात असे. त्याला कारण जसा सिंघण गुणवान होता तसा तिचा मुलगा नव्हता.

तिचा मुलगा विजयसिंह एक विदूषक होता. राजा वाकाटकाला विजयसिंहाशिवाय दुसरा जवळच्या नात्याचा कुणी वारसदार नव्हता. राजानंतर हें राज्य आपल्या मुलालाच मिळेल याविषयीं विमलादेवीची खात्री होती. राजानं जरी सिंघणला पालनपोषण करून मोठं केलं असलं तरी राज्य आपल्या मुलालाच मिळायला पाहिजे असं तिला वाटत होतं.

पण दिवसेंदिवस राजकुमार सिंघणची लोकप्रियता, त्याचे लोकोत्तर गुण, राजा–राणीचा त्याच्यावरचा वाढता लोभ पाहून विमलादेवी मनांतल्या मनांत जळत असे. राजा एखादे दिवशीं पटकन् राजकुमार सिंघणला राजा करून टाकील. मंत्रिमंडळहि सिंघणलाच राजा करण्यांत मदत करील यांविषयीं तिला तिळ-

मात्र शंका नव्हती.

आपल्या विजयला राज्य मिळायचं असेल तर सिंघणचा कांटा काढायला पाहिजे असंच तिला वाटत होतं. पण तें करायचं कसं हें तिला कळत नव्हतं. कारण आपण सिंघणचा घात करण्याचा प्रयत्न करतों आहोंत असं जरी कळलं तरी लोक आपल्या व विजयच्या जिवावर उठतील अन् राजा आपल्याला हद्दपार करील हें तिला माहीत होतं.

त्यांतच राजकुमार सिंघणचं लग्न करायचं राजानं ठरवलं. तें ऐकतांच विमलादेवी राजापाशीं गेली. राजानं तिचं स्वागत केलं.

'आज कसं काय येणं केलंस ताई ?' राजानं विचारलं.

'तूं सिंघणचं लग्न करण्याच्या खटाटोपांत आहेस असं कळलं म्हणून मुद्दाम आलें.'

'तुझ्या लक्षांत एखादी त्याच्यायोग्य सुंदर राजकुमारी आहे वाटतं ?' राजानं उत्सुकतेनं विचारलं.

'मी तुला कांहीं सांगायला आलें आहे.'

'सांग.' राजा हंसत म्हणाला.

'तूं सिंघणचं पालन स्वतःच्या मुलासारखं केलं हें ठीक आहे. पण आतां त्याचं लग्न एखाद्या राजकुमारीशीं करण्याचा प्रयत्न करतो आहेस हें बरोबर नाहीं.'

'म्हणजे ?' राजानं आश्चर्यानं विचारलं

'तो तुझ्या राणीला न्हाणीघरांत सांपडला हें सर्व जगाला माहीत आहे आज लोक बोलत नसले तरी उद्यां विचारल्याशिवाय रहाणार नाहींत. तूं ज्या राजकुमारीची त्याच्यासाठीं निवड करशील तिचा बाप या पोराचं कुलशील विचारल्याशिवाय रहाणार नाहीं.'

'तूं म्हणतेस तसं मला वाटत नाहीं राजकुमार सिंघण इतका सुंदर, बलवान, गुणवान आहे कीं...'

'वेळ आली म्हणजे असल्या गुणांना कोणी विचारीत नाहीं.'

राजाच्या लक्षांत विमलादेवीचा कावा ताबडतोब आला. तो

संतापला, 'राजकुमार सिंघणचा तूं द्वेष करतेस हें मला माहीत आहे. तुझ्या त्या मूर्ख पोराला राज्य मिळावं म्हणून ही तुझी खट-पट आहे. पण लक्षांत ठेव. तूं कांहीं नसत्या उचापती करण्याचा प्रयत्न केलास तर त्याचे परिणाम तुला आणि तुझ्या पोराला भोगावे लागतील. आज हें मजजवळ बोललीस तें विसर. पुन्हां असं कुणाजवळ बोलूं नकोस. जा, चालती हो येथून !'

एखाद्या नागिणीसारखी फुत्कारत विमला तेथून निघाली. महाराजांच्या महालांतच काम करणारी काशी हें सर्व ऐकत होती. विमलादेवी निघून जातांच ती पण तिच्या मागोमाग तिच्या घरीं आली.



विमलादेवी संतापांतच होती. काशीला पहातांच जास्तच चिडली. 'तूं राजवाड्यांतली दासी इथं माझ्या घरीं कशाला आलीस ?'

काशीनं हात जोडले आणि ती नम्रपणानं म्हणाली, 'ताई-साहेब, तुमचं आणि राजेसाहेबांचं सर्व बोलणं मीं ऐकलं आहे.

आपले कुमार विजयसिंह राजगादीवर बसतील अशी युक्ति मला माहीत आहे.'

विमलादेवीला हर्ष झाला. पण ही राजाची दासी मुद्दाम आपल्या मनाचा थांग लावण्यासाठीं राजानंच पाठवली असावी असं तिला वाटलं. ती सावध झाली. संतापाचं नाटक करत ती म्हणाली, 'कुमार विजयसिंहाला गादी मिळावी असं मी बोललेंच नाहीं...'

'ताईसाहेब, राजवाड्यांतच माझा जन्म गेला. मला ह्या भानगडी कळतात. राजकुमाराचं लग्न एखाद्या राजकुमारीशीं झालं म्हणजे त्याची शक्ति वाढेल. त्याचा सासरा सर्व शक्तीनिशीं त्याच्यामागं उभा राहील आणि विजयसिंहांना राज्य मिळण्यांत अडचण उभी राहील. या धूर्त विचारानंच तुम्ही राजाला भेटायला गेलां होतां ना ?'

तरीहि तिच्यावर विश्वास ठेवायला विमलादेवी तयार नव्हती. तिची ती अवस्था काशीनं बरोबर ओळखली.

तीं म्हणाली, 'ताईमहाराज, मी गरीब दासी आहें. मला कांहीं पैसा मिळावा व तुमचं काम व्हावं असं वाटलं, म्हणून मी आलें आहें.'

विमलादेवीनं तिला एका गुप्त खास खोलींत नेलं.

'सांग आतां.' विमलादेवी म्हणाली.

'आधीं मला दहा हजार सुवर्ण मोहोरा देण्याचं वचन द्या.'

'देईन. माझं काम होताच देईन. अगदीं माझ्या लाडक्या विजयची शपथ देईन.'

'राजज्योतिषानं सांगितलेलं सिंघणचं भविष्य मला माहीत आहे.' असं म्हणून तिनं ज्योतिष्यानं सांगितलेली सिंघणच्या पूर्वजन्माविषयीची हकीकत सांगितली.

तें ऐकून विमलादेवी विचारांत पडली. 'काशी, राजकुमाराला तो कोण आहे असं विचारायला हवं, त्याला तें सांगायला भाग पाडायला पाहिजे....'

'तेंहि होईल.'

'पण कोण करील ?'

'तुम्हीं जरा धीर धरा. त्यांचं लग्न होऊं द्या. म्हणजे त्यांची बायकोच त्यांना तें विचारील.'

'पण ती...म्हणजे स्वतःच्या नवऱ्याचा घात कसा करील ? राणी तिला आधींच सावध करून ठेवील.'

'करूं द्या. तिला सिंघणला तो कोण आहे हें विचारायला लावणं हें माझं काम आहे.'

'पण....'

'तुम्ही आतां पण परंतु करूं नका. काशीची करामत पहात रहा. दहा हजारांपैकीं एक हजार मोहोरा आधीं द्या.'

विमलादेवीनं तिला हजार मोहोरा दिल्या आणि काशी परत राजवाड्यांत आली.

नंतर मालव देशाच्या रूपगुणसंपन्न राजकुमारी चंचलेशीं सिंघणचा विवाह झाला. राजा-राणीनं स्वतःच्या मुलासारखा सर्व सोहळा, हौसनिऊस केली. सर्वत्र आनंदीआनंद झाला. एक महिनाभर राजकुमाराच्या लग्नाचा सोहळा चालला होता.

राजकुमारी चंचला अत्यंत भोळी होती. तिची आणि सिंघणची जोडी छान जमली. दिवसांमागून दिवस मजेंत जायला लागले.

जसजसे दिवस गेले तसतसं चंचलेच्या लक्षांत आलं कीं, काशी नांवाची दासी आपल्याकडे पाहून हळहळल्यासारखा उसासा सोडते, कींव आल्यासारखा चेहरा करते. रोज रोज तसं पाहून एक दिवस तिनं काशीला बोलावलं.

काशी हात जोडून उभी राहिली.



'तुझं नांव काशी आहे ना ?'

'हो, सरकार.'

'तूं नेहमीं माझ्याकडे पाहून कींव आल्यासारखा चेहरा करतेस; उसासा सोडतेस, असं कां ?'

काशी थरथर कांपायला लागली. रडक्या आवाजांत म्हणाली, 'मला माफ करा. माझी चूक पदरांत घ्या.'

'पण तूं तसं कां करतेस ?'

'तें मीं तुम्हांला सांगितलं असं राजा, राणी किंवा राजकुमार सिंघण यांना कळलं तर ते माझी धिंड काढतील. मला जिवंत सोलून कोल्ह्या–कुत्र्यांपुढं टाकतील.'

'तें मला कांहीं माहीत नाहीं. तूं तें मला सांगितलंच पाहिजे.'

'पण कुणाला कळलं...' काशीनं आवंढा गिळला.

'मी कुणालाच कांहीं सांगणार नाहीं.' राजकुमारी चंचला तें गुपित ऐकायला अधीर झाली होती.

काशीनं इकडे तिकडे पाहिल्याचं नाटक केलं आणि ती म्हणाली, 'राजकुमार सिंघण वाकाटक महाराज आणि राणी कमलादेवींचे पुत्र नाहींत.'

राजकुमारीला धक्का बसला.

'ते कोण आहेत हें फक्त त्यांनाच माहीत आहे. ते लहान असतांना महाराणीला सांपडले होते. त्यांचं कुळ काय, त्यांचे आई-बाप कोण याविषयीं खूप तपास करण्यांत आला. पण पत्ता लागला नाहीं. अशा कुलशील अज्ञात असलेल्या तरुणाशीं तुमचं लग्न झालं, एक राजकुमारी असून लग्न झालं याचं मला नेहमींच वाईट वाटतं. तुम्हांला पाहिलं कीं मला तुमची कींव येते.'

राजकुमारी कांहीं बोलली नाहीं, पण तें शल्य तिच्या मनांत घर करून बसलं. ज्याच्या कुलशीलाचा पत्ता नाहीं अशा तरुणाशीं आपण लग्न केलं म्हणजे लावण्यांत आलं. आतां आयुष्यभर आपल्याला उपहास सहन करावा लागणार या कल्पनेनं ती जास्तच व्यथित झाली.

आपला बाण वर्मी लागला आहे हें काशीनं ओळखलं. ती पुन्हां सहानुभूतीचं नाटक करीत म्हणाली, 'हें सर्व सहन केलं असतं, पण राज्य सिंघणकुमारांना मिळणार नाहीं! ...'

राजकुमारीच्या बदामी डोळ्यांत पाणी तरारलं, 'मग....मग हें राज्य कुणाला मिळणार?'

'राजेसाहेबांचा खरा वारस एकच आहे. त्यांच्या बहिणीचा मुलगा विजयसिंह. त्यालाच हें राज्य मिळणार आहे....'

श्रेय हरपल्यासारखी राजकुमारीची अवस्था झाली.

'यावर उपाय आहे.' काशी हळूच म्हणाली.

'कोणता ?' राजकुमारीनं उत्सुकतेनं विचारलं.

'राजकुमार सिंघण खरोखर कोण आहेत हें माहीत व्हायला पाहिजे.'

'मी आजच विचारतें.'

काशी नंतर बराच वेळ बोलत होती. पण राजकुमारीचं तिच्या बोलण्याकडे लक्ष नव्हतं.

रात्र झाली. राजकुमार सिंघण राजकुमारी चंचलेच्या महालांत आला. राजकुमारीनं शृंगार केला नव्हता. नेहमींसारखी ती हंसत नव्हती. रडरडून तिचे डोळे सुजले होते. केंस अस्ताव्यस्त पसरले होते.

सिंघण तिच्याजवळ गेला. 'काय झालं प्रिये ?' त्यानं मायेनं विचारलं व तिच्या पाठीवर हात ठेवला.

तिनं सिंघणचा हात झटकून टाकला आणि ती रागानंच दूर जाऊन उभी राहिली.

सिंघण पुन्हां तिच्याजवळ गेला, 'माझ्याकडून कांहीं चूक झाली का ?... तुला कुणी कांहीं बोललं का ?'

राजकुमारीनं मान वळवून सिंघणकडे रागानं पाहिलं. पण ती बोलली कांहींच नाहीं.

'तुला अशा दुःखांत पाहून मला फार वाईट वाटतं.' सिंघण म्हणाला.

राजकुमारी त्याच्याकडे वळली, 'माझ्याबद्दल तुम्हांला वाईट वाटतं ?'

'हो. अगदीं माझी शपथ.'

'मला शपथ नको आहे. मी विचारीन तें खरं खरं सांगाल ?'

'हो. अगदीं सत्य सांगेन.'

'वचन द्या...'

'माझ्या शब्दावर तुझा विश्वास नाहीं ?'

'तें मला कांहीं माहीत नाहीं. मला वचन द्या.'

'दिलं वचन ! विचार–'

'तुम्ही खरोखर कोण आहांत ?'

आणि हा प्रश्न ऐकून सिंघण दचकला. पण त्यानं स्वतःला सांवरलं. 'हात् रे वेडी, अग, मी सिंघण आहें.'

'तें मला माहीत आहे. तुम्ही खरोखर कोण आहांत तें मला पाहिजे आहे.'

सिंघण गंभीर झाला. 'प्रिये, तूं तें विचारूं नकोस.'

'मी विचारणार. तुम्हीं मला वचन दिलं आहे.'

'त्याचे परिणाम भयंकर होतील.'

'होऊं दे. कुलशील नसलेल्या बेगडी राजकुमाराशीं माझं लग्न झालं यापेक्षां जास्त काय भयंकर व्हायचं आहे ?'

'तुझा माझा वियोग होईल.'

'हे सर्व तुमचे न सांगण्याचे खेळ आहेत. पण मी काय सांगतें तें कान उघडे ठवून ऐका. तुम्ही खरोखर कोण आहांत हें तुम्हीं जर मला सांगितलं नाहीं तर मी अन्नाचा कणच काय पण पाण्याच्या थेंबालाहि शिवणार नाहीं.'

'अजूनहि हा हट्ट सोड चंचले....'

'नाहीं, मला कळायलाच पाहिजे !'

'ऐक मग–मलाहि पृथ्वीवर माणूस म्हणून रहाण्याचा कंटाळा आला आहे. मी आहें पाताळलोकींचा 'नाग राजपुत्र' एका

लांकुडतोड्याचं भलं करण्यासाठीं मी रत्नहार झालों आणि राणीची मातृत्वाची हौस पुरविण्यासाठीं राजपुत्र झालों !'

चंचला पहातच होती.



बोलतां बोलतां राजकुमार सिंघण जातिवंत नाग झाला आणि सळसळत निघून गेला.

राजकुमारी चंचला टाहो फोडून रडायला लागली.

सगळ्या राजवाड्यांत एकच हाहा:कार उडाला.

**समाप्त**